**वैध मापन शास्त्र यंत्रणेच्या संगणकीकरण प्रकल्पासाठी प्रशासकीय मंजूरी देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : वैमाशा-२०२० /प्र.क्र.२६ /ग्रा.सं.-३**
दुसरा माळा, मंत्रालय (विस्तार),
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १७ मार्च, २०२०

वाचा - १) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग, क्र. सीओएम १००१/ प्र.क्र.१७४/०१/३९, दि.२९.१०.२००१
२) शासन निर्णय, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, क्र.वैमाशा-२०१७/ प्र.क्र.११४/ ग्रासं. ३, दि.२८.०३.२०१८
३) शासन निर्णय, अ.ना.पु.व ग्रा.सं. विभाग क्र. वैमाशा-२०२०/प्र.क्र.२६/ ग्रासं.३, दि.११.०२.२०२०

**प्रस्तावना :-**

वैध मापन शास्त्र यंत्रणेच्या संगणकीकरणाच्या प्रस्तावास दि. ९ फेब्रुवारी, २०१७ च्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या (PIC) बैठकीमध्ये मान्यता देण्यात येऊन त्याकरीता Application software (e Mapan), Cost of client site hardware and Network आणि Cost of help desk support या बाबींसाठी रू.३.७३ कोटी इतक्या खर्चास प्रकल्प अंमलबजावणी समितीने (PIC) मान्यता दिली आहे. समितीच्या मान्यतेनुसार उपरोक्त क्र.२ येथील दि.२८.०३.२०१८ च्या शासन निर्णयान्वये Laptop व e mapan software साठी रू.३.७३ कोटी इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती.संदर्भ क्र.३ च्या शासन निर्णयान्वये सदर प्रकल्पाच्या उर्वरीत कामांसाठी रू.२,८६,९३,५९०/- एवढ्या रक्कमेच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. तथापि, त्यानंतर मे. महाआयटीने दि.२५.०२.२०२० रोजी रू.२,२६,५१,६९४/- इतक्या रक्कमेचे सुधारीत प्रोफॉर्मा इनव्हॉईस सादर केले आहे. त्यानुषंगाने संदर्भ क्र.३ येथील दि.११.०२.२०२० चे प्रशासकीय मान्यतेचे आदेश अधिक्रमित करून नव्याने प्रशासकीय मान्यतेचे आदेश निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

वैध मापन शास्त्र यंत्रणेच्या संगणकीकरणासंदर्भात दि. ८ जानेवारी, २०२० रोजी आयोजित केलेल्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या बैठकीमध्ये या प्रकल्पाच्या उर्वरीत कामांसाठी रू. २,८६,९३,५९०/- एवढ्या रक्कमेस मंजूरी देण्यात आली आहे. त्यानुसार वैध मापन शास्त्र यंत्रणेच्या संगणकीकरणाच्या उर्वरीत कामांसाठी संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णय, दि.११.०२.२०२० अन्वये रू. २,८६,९३,५९०/- एवढ्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. आता या शासन निर्णयान्वये दि.११.०२.२०२० चा शासन निर्णय अधिक्रमित करण्यात येत आहे.

२. मे. महाआयटी यांच्याकडून प्राप्त झालेल्या सुधारीत ईनव्हॉईसनुसार वैध मापन शास्त्र यंत्रणेच्या संगणकीकरण प्रकल्पातील प्रलंबित रक्कमेसाठी रू.८९,६८,८४७/- (रूपये एकोनव्वद लाख अडुसष्ट हजार आठशे सत्तेचाळीस फक्त) इतक्या अनावर्ती खर्चास तसेच ऑनग्राउंड सर्व्हिसेस सपोर्ट व वैध मापन सॉफ्टवेअर देखभाल खर्च यासाठी प्रतिवर्षी रू. १,३६,८२,८४७/- (रूपये एक कोटी छत्तीस लाख ब्याऐंशी हजार आठशे सत्तेचाळीस फक्त) इतक्या अंदाजित आवर्ती खर्चास अशा एकूण रू.२,२६,५१,६९४/-(रूपये दोन कोटी सव्वीस लाख एक्कावन्न हजार सहाशे चौऱ्यांन्नव फक्त) एवढ्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर खर्च मागणी क्र.एम-३, मुख्य लेखाशिर्ष ३४७५- इतर सर्वसाधारण आर्थिक सेवा, १०६- वजने व मापे यांचे विनियमन, (००) (०१) वजने व मापे विनियमन- (नियंत्रक, उप नियंत्रक, वजने व मापे यांची कार्यालये) (३४७५००९३), १७- संगणक खर्च या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सदर लेखाशिर्षाखाली वेळोवेळी उपलब्ध होणाऱ्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय,वित्त विभाग, कार्यासन व्यय-१० यांच्या अनौ.सं.क्र. १३८/२०२०, दि. ११.०३.२०२० नुसार प्राप्त मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२००३१७१११९१०६२०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SHESHRAO BHASKAR KUTE

Digitally signed by SHESHRAO BHASKAR KUTE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=b83dd3164bf1a6f2c48a39007e78789c79c52e07ad200c3250d381947c40582e, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=b9e0c912bdfbc8224f1554ba0bc93342824e4faa118ed64c79ac40826e1611b3, ou=FOOD CIVIL SUPPLY AND CONSUMER PROTECTION DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SHESHRAO BHASKAR KUTE
Date: 2020.03.17 11:21:26 +05'30'

**(शे.भा.कुटे)**
**कक्ष अधिकारी**
**अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**

**प्रति,**

१.महालेखापाल-१, (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
२.महालेखापाल-१, (लेखा व परीक्षा), मुंबई.
३.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
५. नियंत्रक, वैधमापन शास्त्र, मुंबई.
६.वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
७.वित्त विभाग (व्यय-१०), मंत्रालय, मुंबई.
८.निवडनस्ती, (ग्रा.सं.-३).